**<u>केंद्र पुरस्कृत योजना सन २०१४-१५.</u>**
**हत्ती प्रकल्पांतर्गत कोल्हापूर वनवृत्तात हत्तीकडून होणाऱ्या नुकसानीसाठी उपाययोजना करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी-०१.१५/प्र.क्र.०५/फ-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १० मार्च, २०१५.

<u>वाचावे :</u>

१. केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय यांचे पत्र क्र. १-१६/२००९/पीई, दि.०१.०८.२०१४. रोजीचे पत्र.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा., नागपूर यांचे पत्र क्रमांक-कक्ष-१/सी/यो/हत्तीप्रकल्प/प्र.क्र.३८/(१३-१४)/११४२/१४-१५, दिनांक ०७.१०.२०१४.
३. केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय यांचे पत्र क्र. १-१६/२००९/पीई, दिनांक १८.१२.२०१४.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा., नागपूर यांचे पत्र क्रमांक-कक्ष-१/सी/यो/हत्तीप्रकल्प/प्र.क्र.३८/१६२५/१४-१५, दिनांक ०२.०१.२०१५.

**शासन निर्णय** :-

सन २०१४-१५ करिता कोल्हापूर वनवृत्तात हत्तीकडून होणाऱ्या नुकसानीसाठी उपाययोजना करण्यासाठी केंद्र शासनाच्या पर्यावरण व वन मंत्रालयाने वरील संदर्भीय दिनांक ०१.०८.२०१४ पत्रान्वये "हत्ती प्रकल्प" या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत रु. १०.०० लक्षच्या कार्यबाबीस मंजूरी दिली असून प्रथम हप्ता रु **७.९९८ लाख (केंद्र शासनाचा आवर्ती खर्च १००% रु. ७.१९८२ लाख व फ्लेक्सी फंड रु. ०.७९९८ लाख असे एकूण रु.** रु **७.९९८ लाख)** व दि. १८.१२.२०१४ च्या पत्रान्वये रु. ३७.७५५ लक्षच्या कार्यबाबीस मंजूरी दिली असून प्रथम हप्ता **रू. ३०.२०४ लाख (केंद्र शासनाचा आवर्ती खर्च १००% रु. २७.१८३६ लाख व फ्लेक्सी फंड रु. ३.०२०४ लाख असे एकूण रु. ३०.२०४ लाख)** अशा एकूण रु. ४७.७५३ लक्षच्या कार्यबाबीस मंजूरी दिली असून रुपये ३८.२०२ लक्ष निधी केंद्र शासनाने पहिला हप्ता म्हणून मुक्त केला आहे.

सबब, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या विहित प्रयोजनासाठी खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. प्रस्तावातील खर्च लेखाशीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१४) हत्ती प्रकल्प (१०० % केंद्र पुरस्कृत योजना) **(२४०६ २३५७)** या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून आणि सोबत जोडलेल्या मासिक निधी विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावा.

२. मान्यता दिलेल्या खर्चाच्या तपशीलवार बाबी केंद्र शासनाने उपरोक्त संदर्भिय पत्रामध्ये नमूद केल्या आहेत. सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येवू नये.

३. वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहित केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार खर्च करण्यात यावा.

४. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार योजनेची अंमलबजावणी व खर्च करण्यात यावा. तसेच केंद्र व राज्य शासनाने घातलेल्या सर्व अटींचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

हा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक :- ६८/१४७५, दिनांक ०२.०२.२०१५ व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक :- ८१/२०१५/व्यय-१०, दिनांक १६.०२.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१०१५३२१४६११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.03.10 15:42:53 +05'30'

(अरविंद आपटे)
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) कोल्हापूर वनवृत्त, कोल्हापूर

५. मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), कोल्हापूर

६. उपवनसंरक्षक, सावंतवाडी वनविभाग, सावंतवाडी.

७. उपवनसंरक्षक, कोल्हापूर वनविभाग, कोल्हापूर.

८. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षक), मुंबई/नागपूर.

९. कक्ष अधिकारी, (कक्ष १४७५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०.कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

११.ब-१ / फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

******

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०१.१५/प्र.क्र. ०५ /फ-१, दिनांक:- १० मार्च, २०१५ सोबतचे मासिक निधी विवरणपत्र.**

**(रक्कम रुपये लाखात)**

| लेखाशिर्ष | मार्च, २०१५ | एकूण |
|---|---|---|
| २४०६ २३५७ | | |
| ०२-मजूरी | ६.०० | ६.०० |
| २१-पूरवठा व सामुग्री | ३.०० | ३.०० |
| ५० इतर खर्च | २९.२०२ | २९.२०२ |
| एकूण २३५७ | ३८.२०२ | ३८.२०२ |

*****